**"महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ सदस्य निवडणूक-२०१८ साठी राज्य विधानमंडळाचे मुस्लिम सदस्य" व "रु.१ लाख किंवा त्यापेक्षा जास्त उत्पन्न असलेल्या वक्फ संस्थांचे मुतवल्ली" या दोन संवर्गातून प्रत्येक एक पद महिलांसाठी आरक्षित ठेवणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०१८/प्र.क्र.१२२/का.४**
मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २७.०६.२०१८

**प्रस्तावना –**

राज्य वक्फ मंडळावर नियुक्ती करण्याविषयीच्या तरतूदी वक्फ अधिनियम १९९५ च्या कलम १४ अन्वये विहित करण्यात आलेल्या आहेत. सदर तरतुदीनुसार राज्य वक्फ मंडळावर विविध संवर्गातून कमाल १२ सदस्यांची नियुक्ती करता येते. त्यानुसार "राज्य विधानमंडळाचे मुस्लिम सदस्य" व "रु.१ लाख किंवा त्यापेक्षा जास्त उत्पन्न असलेल्या वक्फ संस्थांचे मुतवल्ली" या दोन संवर्गातून प्रत्येकी दोन सदस्यांच्या नियुक्तीकरिता निवडणूक घेण्याची कार्यवाही सुरु आहे. तथापि, वक्फ अधिनियम १९९५ च्या कलम १४(१-A) खालील २ ऱ्या परंतुकातील तरतुदींनुसार महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळावर नियुक्त करण्यात आलेल्या सदस्यांमध्ये किमान दोन महिला सदस्यांचा समावेश असणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेता, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ सदस्य निवडणूक-२०१८ साठी "राज्य विधानमंडळाचे मुस्लिम सदस्य" व "रु.१ लाख किंवा त्यापेक्षा जास्त उत्पन्न असलेल्या वक्फ संस्थांचे मुतवल्ली" या दोन संवर्गातून प्रत्येक एक पद महिलांसाठी आरक्षित ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय –**

वक्फ अधिनियम १९९५ च्या कलम १४(१-A) खालील २ ऱ्या परंतुकातील तरतुदींनुसार महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळावर नियुक्त करण्यात आलेल्या सदस्यांमध्ये किमान दोन महिला सदस्यांचा समावेश असणे आवश्यक असल्याने महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ सदस्य निवडणूक -२०१८ साठी "राज्य विधानमंडळाचे मुस्लिम सदस्य" व "रु.१ लाख किंवा त्यापेक्षा जास्त उत्पन्न असलेल्या वक्फ संस्थांचे मुतवल्ली" या दोन्ही संवर्गातून प्रत्येकी एक पद महिलांसाठी आरक्षित ठेवण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२७१७००५५१४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2018.06.28 10:59:03 +05'30'

**(म.स.चौकेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
३. सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. सर्व सदस्य, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ,पनचक्की,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद,
६. विशेष कार्य अधिकारी, मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७. विशेष कार्य अधिकारी, मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८. स्वीय सहाय्यक, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२